सचिव, सामान्य प्रशासन विभाग व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सीईआर-१००४/प्र.क्र.२६/३१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१/१२/२००४

वाचा:- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.सीईआर-१९८०/सीआर/३१२/८१/३१, दिनांक १९/०१/१९८२

प्रस्तावना :

राज्य शासनाच्या राजशिष्टाचार विभागामार्फत दरवर्षी महाराष्ट्र दिन, स्वतंत्रता दिवस, शपथविधी इ. विविध महत्वाचे कार्यक्रम आयोजित करण्यात येत असतात. सदर कार्यक्रमाच्या आयोजनावरील तसेच अति अति महत्वाच्या मान्यवरांच्या तसेच राज्य अतिथींच्या भेटी संदर्भात होणाऱ्या खर्चास, मंजूरी देण्याचे अधिकार विहीत रकमेच्या मर्यादेपर्यंत राजशिष्टाचार विभागाच्या सचिव तथा मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांना शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.सीईआर-१९८०/सीआर/३१२/८१/३१, दिनांक १९/०१/१९८२ अन्वये प्रदान करण्यात आले होते..

सदर शासन निर्णयात नमूद केलेली खर्च मंजूरीची वित्तीय मर्यादा २२ वर्षापूर्वी असलेल्या वस्तुस्थितीवर आधारलेली असून, कार्यक्रमांच्या आयोजनात कालमानानुसार बऱ्याच मोठया प्रमाणात बदल झालेला असल्यामुळे तसेच, सदर कार्यक्रमाच्या आयोजनांवर होणाऱ्या खर्चात बऱ्याच मोठया प्रमाणात वाढ झाली असल्यामुळे गेल्या तीन वर्षाच्या सरासरीचा विचार करता, शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.सीईआर-१९८०/सीआर/३१२/८१/३१,दिनांक १९/०१/१९८२ मध्ये नमूद केलेल्या सचिव तथा मुख्य राजशिष्टाचार अधिकाऱ्यांच्या वित्तीयं अधिकारांमध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. तद्नुसार शासनाने वर नमूद केलेल्या शासन निर्णयातील सचिव तथा मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांच्या वित्तीय अधिकारांमध्ये खालीलप्रमाणे वाढ करण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

राजशिष्टाचार शाखेमार्फत दरवर्षी आयोजित करण्यात येणाऱ्या राष्ट्रीय तसेच राज्य स्तरीय कार्यक्रमावरील वाढीव खर्च तसेच राज्यास भेटी देणाऱ्या अति अति महत्वाच्या मान्यवरांच्या/ राज्य अतिथींच्या भेटीवरील खर्च तातडीने भागविता यावा. तसेच सचिव तथा मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांना सदर कार्यक्रमाच्या आयोजनाच्या बाबतीत त्यांची कर्तव्ये कोणत्याही प्रशासकीय अडचणींशिवाय तातडीने पार पाडणे तातडीने शक्य व्हावे. या दृष्टीने सचिव तथा मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांना खालीलप्रमाणे वित्तीय अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | राष्ट्रीय तसेच राज्य स्तरीय कार्यक्रमाचे नांव | वित्तीय अधिकारांची मर्यादा |
|---|---|---|
| १ | प्रजासत्ताक दिन (दिनांक २६ जानेवारी) | प्रत्येक कार्यक्रमाच्या आयोजनाकरिता रुपये ९,५०,०००/-पर्यंत (रुपये नऊ लाख पन्नास हजार पर्यंत) |

| | | |
|---|---|---|
| २ | महाराष्ट्र दिन (दिनांक १ मे) | प्रत्येक कार्यक्रमाच्या आयोजनाकरिता रुपये ९,००,०००/-पर्यंत (रुपये नऊ लाख पर्यंत) |
| ३ | स्वतंत्रता दिवस (दिनांक १५ ऑगस्ट) | प्रत्येक कार्यक्रमाच्या आयोजनाकरिता रुपये ६,००,०००/-पर्यंत (रुपये सहा लाख पर्यंत) |
| ४ | मान्यवरांचे शपथ विधी समारंभ | प्रत्येक कार्यक्रमाच्या आयोजनाकरिता रुपये ५,००,०००/-पर्यंत (रुपये पाच लाख पर्यंत) |
| ५ | मान्यवरांना श्रध्दांजली | प्रत्येक वेळेस रुपये २०,०००/- पर्यंत (रुपये वीस हजार पर्यंत) |
| ६ | अति अति महत्वाच्या मान्यवरांच्या / राज्य अतिथींच्या भेटीवरील तसेच त्या संदर्भात होणारा किरकोळ खर्च भागविण्याकरिता | एका वित्तीय वर्षात रुपये १३,००,०००/-पर्यंत (रुपये तेरा लाख पर्यंत) |

२. उपरोक्त खर्च खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून भागविण्यात यावा.

१) अनुदान उपलब्ध असले पाहिजे.

२) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित अधिकाऱ्यांकडून दर वाजवी असल्याचे प्रमाणपत्र आवश्यक असेल त्या वेळी प्राप्त करणे आवश्यक राहील.

३) अस्तित्वात असलेले सर्व संबंधित प्रचलित नियम व कार्यपध्दती अनुसरणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौ. संदर्भ क्र.४४६/०४/व्यय-४, दिनांक १५/०५/२००४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(रा.को. बोरकर)
शासनाचे अवर सचिव.

प्रति,
१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, (W.M.III)महाराष्ट्र, नागपूर,
५) महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, नागपूर,
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई-५१,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
९) वित्त विभाग-व्यय-४, मंत्रालय, मुंबई,
१०) वित्त विभाग, विनियम, मंत्रालय, मुंबई, (२ प्रती)
११) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) सामान्य प्रशासन विभाग/२५,२६, ३० मंत्रालय, मुंबई,
१३) रोखपाल, सा.प्र.वि./३१,
१४) निवड नस्ती.